**महाराष्ट्र शासन**

क्र.कृषिआ-२८२१/प्र.क्र.२५०/१६-अे
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास
व मस्त्यव्यवसाय विभाग, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई -३२
दिनांक : १२ नोव्हेंबर, २०२१.

**विषय:- पुणे येथे कृषी भवन इमारत आणि आयुक्त (कृषि) यांचे निवासस्थान बांधकामासाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**संदर्भ :-** १) आयुक्त (कृषि) यांचे पत्र क्र.कृषिआ/एसीसी/कृ.भ./प्र.क्र.१४२२/ मृद-७/२८८९४/२०२१, दि.०३.०९.२०२१
२) शासन निर्णय क्र.मफुकृवि-१४१९/प्र.क्र.७५/७-अे, दि.१०.११.२०२१

**ज्ञापन :-**

उपरोक्त संदर्भाधीन पत्रान्वये पुणे येथे कृषी भवन इमारत आणि आयुक्त (कृषि) यांचे निवासस्थान बांधकामासाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत प्रस्ताव प्रस्ताव प्राप्त झालेला आहे.

२. शिवाजीनगर पुणे येथील कृषि भवन इमारतींमध्ये कृषि विभागाच्या विविध योजनांची कार्यालये आणि प्रयोगशाळा आहेत. तसेच आयुक्तालयासह संचालकांची प्रमुख कार्यालये, उपकार्यालये मध्यवर्ती इमारत व साखर संकुल येथे आहेत. तसेच कृषि विभागाची इतर अनेक कार्यालये शहरात इतरत्र विखुरलेली असल्याने पुणे मुख्यालयातील सर्व कार्यालये व राज्यस्तरीय आयुक्तालय एकाच ठिकाणी सुसज्ज इमारतीमध्ये असणे कामकाजाच्या दृष्टीने आवश्यक आहे. कृषि विभागाचा लोकसंपर्क लक्षात घेता तसेच आयुक्तालयाच्या अंतर्गत असलेले विविध विभाग विखुरले गेल्याने प्रशासकीयदृष्टया व शेतकऱ्यांच्या दृष्टीने सोईचे नाही. शिवाय साखर संकुल, शिवाजीनगर येथे कार्यरत असलेल्या कार्यालयांसाठी मोठ्या प्रमाणावर परिरक्षाणापोटी निधी द्यावा लागतो. त्यामुळे खर्चही वाढत आहे. कृषि विभागामार्फत शेतकऱ्यांसाठी वेगवेगळे उपक्रम राबविण्यात येत असल्याने एकाच छताखालील अद्ययावत कृषि संकुल बांधणे आवश्यक आहे. कृषि विभागाच्या वहिवाटीतील शिवाजीनगर, पुणे येथील जागेचे एकूण उपलब्ध क्षेत्रफळ २३७५५.०० चौ.मीटर आहे. सदर जागेवर प्रस्तावित कृषि भवन व त्याच्या शेजारी मा.आयुक्त (कृषि) यांचेकरीता अभिहस्तांकीत निवासस्थान बांधणेबाबतचा प्रस्ताव कृषि आयुक्तालयाने सादर केला आहे.

३. नियोजित कृषि भवन, पुणे आणि आयुक्त (कृषि) यांचे निवासस्थान बांधकामाचा आराखडा व सन २०२०-२१ मधील दरसूचीवर आधारित अंदाजपत्रक कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे यांनी तयार केले आहे. सदर अंदाजपत्रक सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मान्यतेसाठी सादर केले

असता, सार्वजनिक बांधकाम विभागाने त्यात काही सुधारणा करुन रु.२०४८०.८५ लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास **प्रपत्र-अ** नुसार सहमती प्रदान केली आहे.

४. नियोजन विभागाच्या दि.११ जून, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.१५ कोटींपेक्षा जास्त किंमतीचे इमारत बांधकामाचे प्रस्ताव मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील सचिव समितीच्या मान्यतेसाठी सादर करणे आवश्यक आहे. सदर तरतुदींनुसार मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील सचिव समितीच्या मान्यतेसाठी प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सचिव समितीने दि.२०.०९.२०२१ रोजीच्या बैठकीत रु.२०४.८० कोटी इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास मान्यता दिलेली आहे.

५. प्रस्तावित कामाचे वर्षनिहाय खर्चाचे अंदाजित नियोजन पुढीलप्रमाणे राहील.

**कृषि भवन, पुणे आणि आयुक्त (कृषि) यांचे निवासस्थान**

| आर्थिक वर्ष | अपेक्षित खर्च (रु.लक्ष) |
|---|---|
| २०२१-२२ | १००० लक्ष |
| २०२२-२३ | ५००० लक्ष |
| २०२३-२४ | ५००० लक्ष |
| २०२४-२५ | ५००० लक्ष |
| २०२५-२६ | ४४८१ लक्ष |
| एकूण | २०४८१ लक्ष |

६. **ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या राहून देण्यात येत आहे.**

अ) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजुरी घेऊनच करावे.

ब) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

क) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७ /तां.क.१, दि.१०/०१/२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

ड) काम सुरु करण्यापूर्वी सर्व संबंधित स्थानिक संस्था/प्राधिकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.

इ) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय .बीडीजी२०१७/प्र.क्र.६०/इमारती-२ दि.०७/०७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

ई) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

**७.** सदर कामाची सुरुवात सन २०२१-२२ या आर्थिक वर्षापासून सुरु होत आहे.

८. सदर कामासाठी येणारा खर्च मागणी क्र.एच-०८, ४०५९ ३०९२ या लेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या मंजूर नियतव्ययातून अर्थसंकल्पित करुन भागविण्यात येईल.

९. प्रस्तुत मान्यता वित्त विभाग, शासन निर्णय दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रसिध्द केलेल्या वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-१९७८, भाग पहिला, उपविभाग-पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद १३४ अंतर्गत तसेच नियोजन विभाग, शासन निर्णय दि.११ जून, २०१८ तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाने अनौ.सं.क्र.११५/२०२१/इमा-२, दि.१६.०९.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**१०.** प्रस्तुत ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२१११११५१५१०४४७७०१ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Sarita Rishi Bandekar Deshmukh
Date: 2021.11.15 15:14:27 +05'30'

**(सरिता बांदेकर-देशमुख)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२. अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४. सचिव (कृषि), कृषि व पदुम,विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५. उप सचिव (अर्थसंकल्प), कृषि पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. संचालक (मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन), कृषि आयुक्तालय, पुणे

८. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर
९. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे
१०.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे
११.कोषागार अधिकारी, पुणे
१२.निवड नस्ती/१६अे